**श्री.कल्पेश बिन्नर व इतर कंत्राटी वाहन चालक यांना मा. प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांचे आदेशान्वये किमान वेतन मानधन रक्कम अदा करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
### शासन निर्णय क्रमांकः न्यायप्र-२०२३/ प्र.क्र.४२/ आरोग्य-४

मंत्रालय, १० वा मजला, संकुल इमारत,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.
दिनांक : ०८ ऑगस्ट, २०२३.

**वाचा** :-

१) आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचे पत्र क्र.आसेआ/कक्ष-३/टे-९/मूळ अर्ज क्र.६२५/२०२१/ श्री कल्पेश बिन्नरवइतर/अनुप्रमा/८९६०-६१/२३,दि. ०४.०८.२०२३ चे पत्र.

२) मा. न्यायालयाचे दि. २७.०६.२०२३ रोजीचे आदेश.

**प्रस्तावना** :-

श्री. कल्पेश बिन्नर व इतर कंत्राटी वाहन चालक यांनी किमान वेतन मिळणेबाबत मा. महाराष्ट्र प्रशासकिय न्यायधिकरण, मुंबई येथे मुळ अर्ज सादर करुन दाद मागितल्याप्रमाणे सदर मूळ अर्जावर दि. २४.०६.२०२३ रोजी सुनावणी झाली असून सदर सुनावणीमध्ये मा. न्यायाधिकरणाने शासन निर्णय दि. २२.०२.२०१९ मधील तरतुदीनुसार अर्जदार यांना रुपये १४,९००/- प्रमाणे मानधन अदा करावे व त्यानंतर मा. उच्च न्यायालाय, नागपूर खंडपीठ यांचेकडील याचिका क्र.२२४७/२०१४ मधील निवाडयानुसार अर्जदार यांना माहे सप्टेंबर, २०२० पासून रु. १९,९००/- प्रमाणे दि.२८.०७.२०२३ पर्यंत मानधन अदा करावे व त्याबाबतचा अहवाल दि. ०१.०८.२०२३ रोजीच्या सुनावणीत पुढील दोन आठवडे मुदत वाढवून दिलेली आहे. यास्तव श्री. कल्पेश बिन्नर व इतर कंत्राटी वाहन चालक प्रकरणी रु. ४४,८६,२२५/- इतक्या रक्कमेस मान्यता व अनुदान मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यासंदर्भात पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय** :-

मा. प्रशासकिय न्यायालय, मुंबई, यांचे दि. २३.०६.२०२३ च्या आदेशास अनुसरुन एकूण रु. ४४,८६,२२५/- इतकी रक्कम श्री. कल्पेश बिन्नर व इतर कंत्राटी वाहन चालक यांना अदा करण्यास या शासन निर्णयान्व्ये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च ग्रामिण रुग्णालयासाठी मागणी क्रमांक आर -१, मुख्य लेखाशिर्ष “२२१०- वैद्यकीय सेवा सार्वजनिक आरोग्य (०६) सार्वजनिक आरोग्य ( ००१) संचालन व प्रशासन ( ०१) ( ०८) प्राथमिक आरोग्य केंद्राचा ग्रामिण रुग्णालया एवढा दर्जा वाढविणे (२२१००४१३) (१०) कंत्राटी सेवा व उपजिल्हा रुग्णालयासाठी मागणी क्रमांक आर-१ मुख्यलेखाशिर्ष २२१० वैद्यकीयसेवा व सार्वजनिक आरोग्य ( ०६) सार्वजनिक आरोग्य ( ००१) संचालन व प्रशासन (०१) (०९) महाराष्ट्र आरोग्य सेवा विकास प्रकल्पअंतर्गत ग्रामिण / कुटीर रुगणालयाचे उपजिल्हा रुग्णालयामध्ये श्रेणीवर्धन ( २२१०४६२४) ( १०)

या लेखाशिर्षाखालील सन २०२३-२४ च्या मंजूर अनुदानातून खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून भागविण्यात यावा :-

**अटी व शर्ती** :-

१) अर्थसंकल्पात तरतूद उपलब्ध असावी.

२) न्यायालयाच्या अंतिम निर्णयानुसार किंवा न्यायालयीन निर्णयाबाबत पुनर्विलोकन अर्ज किंवा अपील करावयाचे सर्व मार्ग संपल्यास करावयाच्या प्रदानांबाबतच सदर शक्तीचा वापर करण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम,भाग-२, दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग-पहिला, उपविभाग-दोन मधील अनुक्रमांक २ नियम क्रमांक ७ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८०३११५३०५२२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHOK MAROTI ATRAM

Digitally signed by ASHOK MAROTI ATRAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5F7ECA1F400D866EA34324CEA1A547AA04F0DA0794A00BEE126E8678172A15C5, cn=ASHOK MAROTI ATRAM
Date: 2023.08.10 13:03:27 +05'30'

**(अशोक आत्राम)**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल (लेखा व लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
२. संचालक, आरोग्य सेवा-१, आरोग्य सेवा आयुक्तालय, आरोग्य भवन, मुंबई.
३. संचालक, आरोग्य सेवा-२, आरोग्य सेवा संचालनालय, आरोग्य भवन, पुणे.
४. मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई.
५. सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), मुंबई.
६. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा),आरोग्य सेवा, पुणे.
७. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), पुणे.
८. उपसंचालक, आरोग्य सेवा, ठाणे मंडळ, ठाणे.
९. जिल्हा शल्य चिकित्सक, पालघर/ठाणे
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, पालघर/ ठाणे.

११. वैद्यकीय अधिक्षक, उपजिल्हा रुग्णालय शहापूर / कासा .
१२. वित्त विभाग (विनियम कार्यासन ), मंत्रालय, मुंबई.
१३. वैद्यकीय अधिक्षक, ग्रामीण रुग्णालय, मुरुड/ बदलापूर/ अंबाडी फाटा /मुरबाड/ खर्डी.
१४. अवर सचिव (अर्थसंकल्प), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. निवडनस्ती( आरोग्य-४ ), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.